जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रमाच्या राज्यात प्रत्यक्षपणे प्रभावी अंमलबजावणीसाठी क्रियान्वयन समिती गठीत करणे

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- अंश्रनि२०२२/प्र.क्र.१०८ /सामासू**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई- ४०००३२,

दिनांक :- १५ मार्च, २०२४

**वाचा :-**
1) महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानूष ,अनिष्ट व अघोरी प्रथा व जादूटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समूळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम -
2) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक अंश्रनि-२०१४ /प्र.क्र. २९३ / सामासू, दि.१२ ऑगस्ट,२०१४
3) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक अंश्रनि-२०१६/ प्र.क्र.३३० / सामासू, दि.०५/०१/२०१७
4) शासन निर्णय,सामाजिक न्याय व विबशेष सहाय्य विभाग क्रमांक डीडीपी-२०१८/ प्र.क्र.१०६/सामासू, दि. १७/०४/२०१८.

**प्रस्तावना:-**

शासनाने दिनांक २० डिसेंबर,२०१३ रोजी "महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष ,अनिष्ट व अघोरी प्रथा व जादूटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समूळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम-२०१३" जारी केला आहे. सदर कायद्याच्या अंमलबजावणीसाठी “जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार व प्रसार कार्यक्रम अंमजबजावणी समिती” दि. १२ ऑगस्ट, २०१४ अन्वये गठीत करण्यात आली आहे. सदर कायदयाची प्रत्यक्षपणे व प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी मा. मंत्री (सा.न्या.) यांच्या अध्यक्षतेखाली दि. ५/४/२०२२ रोजी झालेल्या बैठकीमध्ये दिलेल्या निर्देशानुसार राज्यस्तरीय क्रियान्वयन समिती गठीत करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यानुसार सदर कायदयाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्यासाठी पुर्णवेळ देणाऱ्या अनुभवी तज्ञ सदस्यांची आवश्यकता आहे. अखिल भारतीय अंधश्रध्दा निर्मुलन समिती ही सन १९८२ पासून गेली ४० वर्षे अंधश्रध्दा निर्मुलनच्या क्षेत्रात कार्यरत असणारी संघटना आहे. सदर समितीचा अनुभव विचारात घेवून क्रियान्वयन समितीच्या माध्यमातून प्रभावीपणे काम करता येईल. यास्तव क्रियान्वयन समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष,अनिष्ट व अघोरी प्रथा व जादूटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समूळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम -२०१३ जारी करण्यात आला आहे. सदर कायदयाची परिणामकारक व राज्यात प्रत्यक्षपणे प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी पुढीलप्रमाणे क्रियान्वयन समिती गठीत करण्यात येत आहे.

जादूटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार कार्यक्रम अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय क्रियान्वयन समिती :-

| अ.क्र. | सदस्याचे नाव | पद | समितीचे कर्तव्ये/जबाबदारी |
|---|---|---|---|
| १ | सहअध्यक्ष (PIMC) | राज्य प्रमुख, प्रकल्प क्रियान्वयन | • राज्यस्तरावरील कार्यक्रमाचे संपूर्ण नियोजन.<br>• राज्यस्तरावरील कार्यक्रमांचे क्रियान्वयन<br>• शासनाशी समन्वय<br>• प्रादेशिक/विभागीय व जिल्हा समिती गठीत करणे व अशासकीय सदस्यांची नेमणूक करणे<br>• आर्थिक नियोजन व क्रियान्वयन<br>• क्रियान्वयन समिती कार्यप्रवण करणे, सल्ला व मार्गदर्शन करणे,<br>• राज्य, विभागीय व जिल्हास्तरीय समन्वयकांची नेमणूक व सर्व क्रियान्वयन समितीतील प्रमुखांची नियुक्ती मा. सदस्य सचिव (आयुक्त समाजकल्याण) यांच्या सहमतीने करणे.<br>• या व्यतिरिक्त जादूटोणा विरोधी कायदा प्रचार प्रसार योग्यरित्या होण्यासाठी आवश्यक त्या बाबींचे निर्णय घेणे.<br>• सर्व सहप्रमुख, उपप्रमुख, सहाय्यक उपप्रमुख यांच्याकडून योग्य व आवश्यक ती कार्यवाही करवुन घेणे.<br>• प्रसिध्दी आणि जनसंपर्क, प्रशिक्षण कार्यक्रम आयोजन.<br>• शाळा महाविद्यालय<br>• कार्यक्रम आयोजन, समित्यांचे प्रमुख नेमून त्यांच्याकडून आवश्यक ती कार्यवाही करुन घेणे. |
| २ | सदस्य (PIMC) | सहप्रमुख राज्य प्रकल्प क्रियान्वयन | • राज्यस्तरीय कार्यक्रमांचे क्रियान्वयन<br>• प्रकल्प प्रमुखांमध्ये समन्वय निर्माण करणे<br>• अहवाल सादर करणे.<br>• आर्थिक नियोजन व देखरेख ठेवणे.<br>• क्रियान्वयन समितीने सोपवलेली इतर कामे व जबाबदारी पार पाडणे<br>• राज्य PIMC सह अध्यक्ष तथा प्रमुख क्रियान्वयन यांना सर्वतोपरी सहकार्य करणे. |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | सदस्य (PIMC) | उपप्रमुख,राज्य प्रकल्प क्रियान्वयन तथा जाहिर सभा आयोजन | • जाहीर कार्यक्रमांचे संपूर्ण आयोजन करणे.<br>• स्थळ निश्चिती, प्रचार, प्रसार, इत्यादी आवश्यक बाबी नीट करवून घेणे, कार्यक्रमानंतरची प्रसिध्दी व इतर बाबी नीट करवून घेणे<br>• जाहीर कार्यक्रमांचे अहवाल सादर करणे<br>• संबंधित अधिका-यांच्या सहकार्याने आर्थिक बाबी पासून आवश्यक त्या सर्व बाबींचे व्यवस्थित नियोजन करणे व समन्वय ठेवणे<br>• क्रियान्वयन समितीने सोपविलेली इतर कामे व जबाबदारी पार पाडणे. |
| ४ | सदस्य -----<br>{सहअध्यक्ष (PIMC),आयुक्त, समाजकल्याण यांच्या सहमतीने नियुक्त केलेला सदस्य} | सहाय्यक उपप्रमुख राज्य प्रकल्प क्रियान्वयन तथा समन्वयक | • विभागीय जिल्हास्तरीय समित्या सह अध्यक्षांच्या सल्ल्याने गठीत करणे.<br>• समिती समन्वयन व क्रियान्वयन<br>• प्रकल्पांशी संबंधित इतर जबाबदारी<br>• क्रियान्वयन समितीने व सहअध्यक्षांनी सोपविलेली इतर कामे व जबाबदारी पार पाडणे |
| ५ | सदस्य-----<br>{सहअध्यक्ष (PIMC),आयुक्त, समाजकल्याण यांच्या सहमतीने नियुक्त केलेला सदस्य} | सहाय्यक उपप्रमुख राज्य प्रकल्प क्रियान्वयन तथा शाळा महाविद्यालय कार्यक्रम आयोजन | • संबंधित शिक्षण विभागाकडून आवश्यक ते शासन निर्णय निर्गमित करण्यासाठी पाठपुरावा करणे<br>• संबंधित अधिका-यांचे आवश्यकतेनुसार समन्वय साधून शाळा महाविद्यालयांना सुचना पत्रे व आदेश काढूण घेणे<br>• शाळा महाविद्यालयांचे कार्यक्रम संबंधितांशी संपर्क साधून ठरवणे व त्यानुसार कार्यक्रमासाठी वक्ते पाठविणे<br>• कार्यक्रम पार पडल्याचे प्रमाणपत्राद्वारे संबंधिताचे मानधन व इतर खर्च काढणे आणि अहवाल सादर करणे<br>• क्रियान्वयन समितीने व सहअध्यक्षांनी सोपविलेली इतर कामे व जबाबदारी पार पाडणे |

| | | | |
|---|---|---|---|
| ६ | सदस्य----- {सहअध्यक्ष (PIMC),आयुक्त, समाजकल्याण यांच्या सहमतीने नियुक्त केलेला सदस्य} | सहाय्यक उपप्रमुख राज्य प्रकल्प क्रियान्वयन तथा प्रशिक्षण कार्यक्रम | • ५ दिवसीय वक्ता प्रशिक्षण व कार्यशाळांचे नियोजन व कार्यान्वयन.<br>• वक्त्यांची निवड<br>• एकदिवसीय प्रशिक्षण आयोजित करणे<br>• सामाजिक कार्यकर्ता<br>• ब) पत्रकार<br>• क) पोलिस पाटील<br>• ड) पोलिस कर्मचारी<br>• ई) शिक्षक व इतर शासकीय कर्मचारी<br>• फ) अंगणवाडी सेविका व आशावर्कर इ.<br>• सामाजिक न्याय विभागाचे इतर शासकीय संबंधित विभागांशी प्रशिक्षणाच्या अनुषंगाने समन्वय साधणे व आवश्यक कार्यवाही करणे<br>• शासनाच्या कर्मचारी अधिकारी प्रशिक्षण वर्गासाठी व प्रशिक्षित वक्ते पाठवणे<br>• संबंधित बाबींचा अहवाल सादर करणे सामाजिक न्याय विभाग अधिकारी कर्मचारी पो. कर्मचारी यांच्यासाठी प्रशिक्षण आयोजन करणे<br>• क्रियान्वयन समितीने व सहअध्यक्षानी सोपविलेली इतर कामे व जबाबदारी पार पाडणे |
| ७ | सदस्य----- {सहअध्यक्ष (PIMC),आयुक्त, समाजकल्याण यांच्या सहमतीने नियुक्त केलेला सदस्य} | सहाय्यक उपप्रमुख राज्य प्रकल्प क्रियान्वयन तथा प्रसिध्दी व जनसंपर्क | • प्रसार माध्यमांशी समन्वय साधणे<br>• प्रचार साहित्य निर्मिती<br>• जाहिरात निर्मिती लेख लिहिणे<br>• व्हिडीयो शुटींग व छायाचित्र करुन घेणे व संकलन करण<br>• क्रियान्वयन समितीने व सह अध्यक्षांनी सोपविलेली इतर कामे व जबाबदारी पार पाडणे<br>• सोशल मिडीया निर्मिती आणि क्रियान्वयन |
| ८ | आयुक्त, समाजकल्याण,पुणे यांचे प्रतिनिधी | समन्वयक | समन्वयक |

२. सदर क्रियान्वयन समितीची बैठक वर्षातून किमान २ वेळा होईल.राज्यस्तरीय क्रियान्वयन समितीतील अशासकीय सदस्यांना मानधन, प्रवासभत्ता व दैनिक भत्ता, इतर सोयी सुविधा तसेच मोबाईल इंटरनेटबाबत बाबींवरील खर्च पुढीलप्रमाणे अनुज्ञेय राहील.

**अ)** सदर राज्य क्रियान्वयन समिती मधील उपरोक्त तक्त्यातील नमूद अनुक्रमांक ४ ते ७ येथील सहाय्यक उपप्रमुख,राज्य प्रकल्प क्रियान्वयन या एका पदासाठी मानधन प्रतीमहा रु. ३०,०००/- याप्रमाणे ४ पदांसाठी अशासकीय सदस्यांना माहे रु. १,२०,०००/- (वार्षिक रु. १४,४०,०००/-) इतके मानधन अनुज्ञेय राहील.

**ब)** तसेच, महाराष्ट्रात दौरे करण्यासाठी क्रियान्वयन समितीसाठी सर्व सदस्यांना प्रवास भत्ता व दैनिक भत्ता प्रती महिना रु. ८०,०००/- प्रमाणे वार्षिक खर्च रु. ९,६०,०००/- इतका अनुज्ञेय राहील.

**क)** त्याचप्रमाणे क्रियान्वयन समितीतील सर्व कार्यरत व्यक्तींना मोबाईल इंटरनेट याकरीता दरमहा रु. ५००/- याप्रमाणे रु.४,०००/- (वार्षिक रु.४८,०००/-) इतका खर्च अपेक्षित आहे.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक एन-३,२२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण,(०२) समाज कल्याण,१०६ सुधार सेवा (०१) महाराष्ट्र नरबळी आणि इतर अमानुष अनिष्ट व अघोरी प्रथा व जादूटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व समूळ उच्चाटन करण्याबाबत अधिनियम,२०१३ (०१)(०१) नरबळी आणि इतर अमानुष अनिष्ट व अघोरी प्रथा व जादूटोणा यांना प्रतिबंध घालण्याबाबत व त्यांचे समूळ उच्चाटन करण्याबाबत ( २२३५ बी ३६१) ,२६, जाहिरात व प्रसिध्दी" या लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व मान्यतेने अनुक्रमे अनौपचारीक संदर्भ क्रमांक १४०/२०२२,दि.२८/११/२०२२ व क्रमांक ९५२/२०२३/व्यय-१४,दि.१४/१२/२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtr.gov. in या संकेतस्थळांवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१५२३३११७६३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAJESH SADASHIV MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2024.03.15 23:40:39 +05'30'

**( राजेश मांजरेकर )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिवमुंबई ,मंत्रालय ,
मामुंबई ,मंत्रालय ,यांचे खाजगी सचिव (सर्व) मंत्री .
मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यकमुंबई ,मंत्रालय ,
आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे तथा सदस्य सचिव , PIMC
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारीजिल्हा परिषद ,
सर्व प्रादेशिक उपायुक्तसमाजकल्याण ,
सर्व सहाय्यक आयुक्तजिल्हा समाजकल्याण अधिकारी/ समाजकल्याण ,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
संचालकमाहिती व तंत्रज्ञान महामंडळ ,,मुंबई
सहसचिव अजाक / अर्थसंकल्प)) ,मंत्रालय ,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग ,मुंबई.
सर्व संबधित जादुटोणा विरोधी कायदा जनजागृती प्रचार आणि प्रसार अंमलबजावणी समिती सदस्य
निवडनस्ती.